**श्री. बी.एस.पारिसे, सहायक निबंधक, सहकारी संस्था (गट-ब ) रावेर, जि. जळगाव यांच्या विभागीय संवर्ग वाटपात बदल करुन पदस्थापना देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
## शासन निर्णय क्रमांकः राजस-१२१५/प्र.क्र.५१/१२-स

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १० सप्टेंबर, २०१५

वाचा:- १) **स.प.व व.वि. शा.नि.क्र.राजस-१२११/प्र.क्र.२८४/१२-स, दि.१६/७/२०१२**
२) **सा.प्र.वि. अधिसूचना क्रमांक-एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/१२, दि.२८/०४/२०१५**

**प्रस्तावना:-**

सहकार विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील श्री. बी.एस.पारिसे, सहायक निबंधक, सहकारी संस्था (गट-ब ) रावेर, जि. जळगाव यांना संदर्भाधिन १ येथील शासन निर्णयान्वये विभागीय संवर्गवाटप नियमावली-२०१० नुसार "नागपूर" महसूली विभागात पदस्थापना देण्यात आली आहे. श्री. पारिसे यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त अधिसूचनेतील अनुक्रमांक १२(अ) १ नुसार त्यांच्या आईचे आजारपण ह्दय विकार या कारणास्तव "नाशिक" एवजी "अमरावती" महसूली विभाग बदलून देण्याची विनंती केली आहे. उपरोक्त अधिसूचनेतील अनुक्रमांक १३ नुसार महसूली विभाग बदलीचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले असल्याने श्री. पारिसे, सहायक निबंधक, सहकारी संस्था, गट-ब यांना "नाशिक" महसूली विभाग बदलून देण्याची विनंती शासनाने मान्य केली आहे. त्यानुसार त्यांना "नाशिक" ऐवजी "अमरावती" महसूली विभाग बदलून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

सहकार विभागाच्या क्षेत्रिय आस्थापनेवरील श्री. बी.एस.पारिसे, सहायक निबंधक, सहकारी संस्था, (गट-ब ) रावेर, जि. जळगाव (वेतन श्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे ४४००/-) यांना उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन अधिसूचनेतील तरतूदीनुसार "नाशिक" ऐवजी "अमरावती" महसूली विभाग वाटप करण्यास मान्यता देण्यात येत असून त्यांना सहायक निबंधक, सहकारी संस्था, चांदूर रेल्वे, जिल्हा-अमरावती या रिक्त पदावर बदलीने पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री. पारिसे यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक अंतिम वेतन प्रमाणपत्र तात्काळ नवीन कार्यालयाकडे पाठविण्याबाबत सूचना देण्यात याव्यात.

३. श्री. पारिसे यांची शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये तसेच म.ना.से. (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारे रजेचे अर्ज स्विकारु नयेत, असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नसल्याच्या सूचना देण्यात याव्यात.

४. श्री. पारिसे यांनी केलेल्या विनंतीनुसार त्यांच्या विभागीय संवर्गात बदल करुन सुधारित पदस्थापना करण्यात येत असल्याने त्यांना पदस्थापनेच्या अनुषंगाने भत्ते व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी सदरचे आदेश तत्काळ अंमलात येतील हे कृपया पहावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१०१४५५०७४६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Muloo Dhadwe

Digitally signed by Suresh Muloo Dhadwe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Suresh Muloo Dhadwe
Date: 2015.09.10 14:58:31 +05'30'

**(सु.मु.धाडवे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.राज्यमंत्री (सहकार)/मा.राज्यमंत्री (पणन)/मा.राज्यमंत्री (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था.
५. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, जळगांव, अमरावती.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव, अमरावती
८. अपर मुख्य सचिव (पणन)/ अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग)/प्रधान सचिव (सहकार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
९. संबंधित अधिकारी द्वारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,म.रा.पुणे.
१०. कक्ष अधिकारी (५-स), स.प.व व.वि, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती.